**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील ३५/१६ एम.एम.फिल्मवरील माहितीपट व समाचार चित्रांचे डीव्हीसी प्रो व डीव्हीडीवर रुपांतरण व पुनरुज्जीवन करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग.

शासन निर्णय क्रमांक.मावज-२०११/प्र.क्र.२०३/का.३४.

मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दि. १७ ऑगस्ट , २०११**

**संदर्भः-** १) शा.नि.क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.२४८/का-३४, दि.१६ ऑक्टोबर, २०१०.
२) शा.नि.क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.२४८/का-३४, दि.१३ डिसेंबर, २०१०.
३) मा. व ज. सं.पत्र क्र.वृत्तचित्र-२०११-१२/व्हिकॅसख-फि.रु.पु./का-७/१५१, दि.२१.०४.२०११.

**शासन निर्णयः-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील ३५/१६ एम.एम. फिल्मवरील माहितीपट व समाचार चित्रांचे डीव्हीसी प्रो व डीव्हीडी रुपांतरण व पुनरुज्जीवन इत्यादी करण्याचा निर्णय संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. तसेच शासन निर्णय संदर्भ क्र.२ अन्वये रु.५०.०० लाखाचे सदरचे काम करुन घेण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता या शासन निर्णयान्वये उर्वरित **रु.७४,४५,५००/- (रुपये चौऱ्याहत्तर लाख पंचेचाळीस हजार पाचशे फक्त)** इतक्या रकमेचे सदरचे काम मे.फेमस स्टुडिओ लि. मुंबई यांचेकडून दि.२६.०३.२०११ ते दि.२५.०३.२०१२ या कालावधीपर्यंत करुन घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीवरील खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र. ए-६, २२२०-माहिती व प्रसिध्दी, १०९ छयाचित्र सेवा, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(०१) छायाचित्र सेवा (२२२० ०४१९) १०-कंत्राटी सेवा या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ मध्ये मंजूर असलेल्या अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार विहित कार्यपध्दतीचा अवलंब करून भागविण्यात यावा.

३. सदर आदेश नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०३/१४४३, दि.१८.०६.२०११ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५६७/११/व्यय-४, दि.१०.०८.२०११ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असा आहे.

महाराष्ट्राच्या राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( आ.म. लुडबे )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
उप सचिव वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षाअधिकारी, मुंबई.
उप संचालक (लेखा) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
मे.फेमस स्टुडिओ लि. मुंबई (माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत),
**निवड नस्ती** (का.३४).